उच्च व्यावसायिक व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेणाऱ्या राज्यातील अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती योजना सन २०१८-१९ साठी अनुदान वितरण करणेबाबत .

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्यांक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०१८/९१२/प्र.क्र.२२६/का-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १० ऑक्टोबर, २०१८

वाचा -

१. अल्पसंख्यांक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०११/प्र.क्र.४४/११/का-६, दिनांक १४/१०/२०११
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ -३, दिनांक ०२ एप्रिल,२०१८

प्रस्तावना :-

राज्यातील अल्पसंख्याक समाजातील उच्च व्यावसायिक शिक्षण घेणाऱ्या व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेत असलेल्या आर्थिक दृष्टया कमकुवत व गुणवत्ताधारक विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्ती योजनेची अंमलबजावणी दिनांक १४/१०/२०११ च्या शासन निर्णय अन्वये करण्यात येत आहे.

२. शासन परिपत्रक अल्पसंख्यांक विकास विभाग क्रमांक : अविवि-२०१८/प्र.क्र.२८/का-७, दिनांक १४/०६/२०१८ अन्वये सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता "(०१) (२०) उच्च शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजनेकरिता सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५ ए ३३८) ३४, शिष्यवृत्त्या/ विद्यावेतन" या लेखाशीर्षाखाली रु.११०.०० कोटी (रुपये एकशे दहा कोटी) इतका नियतव्यय मंजूर आहे. त्यापैकी ७०% टक्के म्हणजे रु. ७७.००कोटी (रुपये सत्याहत्तर कोटी) इतका नियतव्यय एप्रिल २०१८ ते डिसेंबर २०१८ या नऊमाहीच्या खर्चासाठी उपलब्ध करुन दिलेला आहे. या योजनेकरीता "नोडल अधिकारी" म्हणून काम करणाऱ्या अधिकाऱ्यांकडे या निधीचे वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या योजनेसाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता "मागणी क्र.झेड ई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (२०) उच्च शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्याक विद्यार्थ्याकरीता शिष्यवृत्ती योजनेकरीता सहाय्यक अनुदान (कार्यक्रम) (२२३५-ए-३३८) ३४, शिष्यवृत्त्या/ विद्यावेतने" या लेखाशीर्षाखाली रु. ११०.०० कोटी (रुपये एकशे दहा कोटी) इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. परंतु संदर्भ क्र.२ च्या शासन परिपत्रकान्वये सन २०१८-१९ या वर्षात डिसेंबर, २०१८ पर्यंत खर्चाची मर्यादा ७०% केली आहे. त्यामुळे अल्पसंख्यांक समुदायातील विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती वाटपासाठी आता रु. ७७.०० कोटी (रुपये सत्याहत्तर कोटी) इतका निधी उपलब्ध आहे. सदर तरतुदीतून या योजनेची अंमलबजावणी करणाऱ्या नोडल अधिकाऱ्यांना पुढील प्रमाणे निधी वाटप करण्यात येत आहे.:-

| अ.क्र. | संचालनालय | रुपये (रु. कोटी) |
|---|---|---|
| १ | संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | रु. ६७.०० |
| २ | संचालक, वैद्यकिय शिक्षण व संशोधन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | रु. १०.०० |
| | एकूण | रु. ७७.०० |

२. सदर योजनेंतर्गत सन २०१८-१९ या वर्षातील ऑक्टोबर, २०१८ ते डिसेंबर, २०१८ या ३ महिन्यासाठी वरील विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई यांना रु. ६७.०० कोटी (रुपये सदोसष्ट कोटी) तसेच संचालक, वैद्यकिय शिक्षण व संशोधन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना रु. १०.०० कोटी (रुपये दहा कोटी) अशा एकूण रु. ७७.०० कोटी (रुपये सत्याहत्तर कोटी) एवढा निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे. सन २०१८-१९ या वर्षातील शिष्यवृत्तीसाठी पात्र ठरलेल्या अल्पसंख्यांक समुदायातील विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर करण्यासाठी सदर रक्कम त्यांच्या स्वाधीन करण्यात येत असून याकरीता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुबई आणि संचालक, वैद्यकिय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सन २०१८-१९ करीता मंजूर केलेले निधीचे मर्यादेपर्यंतच खर्च करावा. उपरोल्लेखित लेखानुदानाच्या खर्चाचा तपशिल व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास विहित कालावधीत सादर करावे. तसेच हे अनुदान खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पिय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकारी नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वेळोवेळी शासनाने या अनुषंगाने दिलेले सर्व निर्देश/नियम/शासन निर्णय/आदेश आणि केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचना व नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या निरीक्षणाचे पालन करण्यात यावे. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१ वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र१००८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दि.१५.०५.२००९, अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत/विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग यांनी प्रशासनिक विभाग प्रमुख या नात्याने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२/०४/२०१८ मधील परिच्छेद क्र.७ ते १८ मधील अटीची व त्यासोबतच्या परिशिष्ट मधील अ.क्र.३ व ९ मधील अटीची पूर्तता होत असून, सदर शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग शासन परिपत्रक क्र.अविवि-२०१८/प्र.क्र.२८/का-७, दि. १४/०६/२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च “मागणी क्र.झेड ई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५,सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (२०) उच्च शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजनेकरिता सहाय्यक अनुदान (कार्यक्रम) (२२३५-ए-३३८) ३४ शिष्यवृत्त्या/विद्यावेतने” या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०१०१०५१५१२८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=39e858554371a26f6672b036224cff0a48a63a836a4067a8da9a8cca6d83429e, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2018.10.11 10:28:09 +05'30'

**(सं.छ.तडवी)**

सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव

२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री अल्पसंख्याक विकास यांचे खाजगी सचिव
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्य विभाग, जी.टी. रुग्णालय, नवीन मंत्रालय, मुंबई
११. संचालक, उच्च शिक्षण, उच्च शिक्षण संचालनालय, पुणे
१२. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई
१३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, मुंबई
१४. अवर सचिव (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवडनस्ती (का-६)